महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१४/प्र.क्र.३०३/२०१४/आस्था-३**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.
तारीख : ०२ जानेवारी, २०१५.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार सदर अधिनियमाच्या कलम ४ (४) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने श्री.एस.पी. पाटील, सध्या नियुक्तीशिवाय (रजेवर) यांना या आदेशान्वये गट विकास अधिकारी, पंचायत समिती इंदापूर, जि.पुणे या रिक्त पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

२. श्री.एस.पी. पाटील यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक: सीडीआर १०८२/२५६७/ २८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री.एस.पी. पाटील यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०२११३१५३५६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bandekar-Deshmukh Sarita Rishi

Digitally signed by Bandekar-Deshmukh Sarita Rishi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Bandekar-Deshmukh Sarita Rishi
Date: 2015.01.02 12:35:39 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त कोकण / अमरावती.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती.
३. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
४. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
६. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
७. श्री.एस.पी. पाटील, १०४, विल्ड वेज, धनराज मंगल कार्यालयाच्या शेजारी, बाणेर, पुणे- ४५.
८. कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
९. निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग